**श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी या संस्थानात अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती-बाबतची नियमावली.**

# महाराष्ट्र शासन

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्र. सासंवि -१०१९/८१३/प्र.क्र.१५३/का.१६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २७ ऑगस्ट, २०२०.

संदर्भ:- १) मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था,शिर्डी यांचे पत्र क्र.एसएसएस/साप्रशा-आस्था/१८७३/२०१९,दि.१६.०८.२०१९
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था,शिर्डी यांचे पत्र क्र.एसएसएस/साप्रशा-आस्था/४४६१/२०२०,दि.०८.०२.२०२०

**प्रस्तावना:-**

श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी या संस्थानाच्या सेवेत असताना अधिकारी / कर्मचारी दिवंगत झाल्यास किंवा गंभीर आजार, अपघात यामुळे संस्थान सेवा करण्यास वैद्यकीय दृष्टया कायमचा असमर्थ ठरल्यामुळे सेवानिवृत्त झाल्यास अशा कर्मचाऱ्यांच्या कुटुंबावर ओढवणाऱ्या आर्थिक आपत्तीत कुटुंबियांना तातडीने मदत देण्याच्या उद्देशाने सदर कर्मचाऱ्यांच्या कुटुंबातील एका पात्र नातेवाईकास शैक्षणिक पात्रता व वय यानुसार संस्थानांतर्गत गट "क" व गट "ड" या श्रेणीच्या पदावर अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती देण्याबाबतच्या नियमावलीस मान्यता देण्याची विनंती मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांनी त्यांच्या संदर्भाधीन पत्रांन्वये केली आहे. श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी व्यवस्थापन समितीच्या दि.२६.०७.२०१९ रोजीच्या सभेत या नियमावलीस मंजुरी देण्यात आली. त्यानुसार संस्थानात अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती देण्याबाबतच्या नियमावलीस मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था (शिर्डी) (सुधारणा) अधिनियम, २००४ च्या कलम १७(१) मधील तरतुदीनुसार शासन, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी या संस्थानाच्या सेवेत असताना अधिकारी /कर्मचारी दिवंगत झाल्यास किंवा गंभीर आजार, अपघात यामुळे संस्थान सेवा करण्यास वैद्यकीयदृष्टया कायमचा असमर्थ ठरल्यामुळे सेवानिवृत्त झाल्यास अशा कर्मचाऱ्याच्या कुटुंबावर ओढावणाऱ्या आर्थिक आपत्तीत कुटुंबियांना तातडीने मदत देण्याच्या उद्देशाने सदर कर्मचाऱ्याच्या कुटुंबातील एका पात्र नातेवाईकास शैक्षणिक पात्रता व वय यानुसार संस्थानांतर्गत गट "क" व गट "ड" या श्रेणीच्या पदावर अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती देण्याबाबत पुढील नियमावलीस मान्यता देण्यात येत आहे:-

**(१) अनुकंपा नियुक्ती योजनेचा लाभ संस्थानाच्या स्थायी अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या पात्र कुटुंबियांना अनुज्ञेय राहिल.**

**(२) संस्थान सेवेत असताना दिवंगत झालेल्या अधिकारी / कर्मचाऱ्यांच्या पात्र कुटुंबियांना पात्रतेनुसार गट-क व गट-ड संवर्गात अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती अनुज्ञेय राहिल.**

**(३) संस्थानांतर्गत कोणत्याही गट-क व गट-ड मधील सरळ सेवेच्या पदांवर त्या पदाची सेवाप्रवेश नियमातील विहित शैक्षणिक अर्हता असल्यास अशी नियुक्ती देता येईल.**

**(४) अनुकंपा नियुक्तीसाठी पात्र कुटुंबिय:-**

(अ) अनुकंपा नियुक्तीसाठी खालील नातेवाईक पात्र राहतील व त्यापैकी एका पात्र नातेवाईकास नियुक्ती अनुज्ञेय राहील :-

**०१.** पती/पत्नी **०२.** मुलगा/मुलगी(अविवाहीत/विवाहीत), मृत्यूपूर्वी कायदेशीररित्या दत्तक घेतलेला मुलगा/मुलगी (अविवाहीत/विवाहीत) **०३.** दिवंगत संस्थान अधिकारी/ कर्मचाऱ्याचा मुलगा हयात नसेल किंवा तो नियुक्तीसाठी पात्र नसेल तर त्याची सून. **०४.** घटस्फोटीत मुलगी किंवा बहिण, परित्यक्ता मुलगी किंवा बहिण, विधवा मुलगी किंवा बहिण **०५.** केवळ दिवंगत अविवाहित संस्थान अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या बाबतीत त्याच्यावर सर्वस्वी अवलंबून असणारा भाऊ किंवा बहिण.

(आ) मृत अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या पती/पत्नीने कोणाची अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती करावी याबाबत नामांकन देणे आवश्यक राहील. मृत अधिकारी/कर्मचाऱ्यांच्या पती/पत्नी हयात नसल्यास त्याच्या/तिच्या सर्व पात्र कुटुंबियांनी एकत्रित येऊन कोणाची नियुक्ती करावी याबाबत नामांकन करावे.

**(५) कुटुंबाची हलाखीची परिस्थिती:-**

(अ) अनुकंपा तत्त्वावर नियुक्तीकरिता मासिक उत्पन्नाची तसेच ठोक रकमेची मर्यादा राहणार नाही.

(आ) अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती देताना असे प्रस्ताव संस्थान सेवेतील रोजगारावर असलेली मर्यादा तसेच या योजनेच्या मागील भूमिका लक्षात घेऊन जो कर्मचारी मृत झाला आहे त्यांच्या कुटुंबियांना तात्काळ उद्भवणाऱ्या आर्थिक पेचप्रसंगावर मात करण्याच्या उद्देशाने विचारात घ्यावेत.

(इ) दिवंगत संस्थान कर्मचाऱ्याचा नातेवाईक पूर्वीच सेवेत असेल तथापि तो त्याच्या कुटुंबातील अन्य सदस्यांना आधार देत नसेल तर अशा प्रकरणात त्या कुटुंबाची आर्थिक परिस्थिती हलाखीची आहे किंवा कसे हे ठरविताना नियुक्ती प्राधिकाऱ्याने अत्याधिक दक्षता घ्यावी, जेणेकरुन सेवेत असलेला सदस्य कुटुंबाचा उदरनिर्वाह करत नाही या नावाखाली अनुकंपा तत्त्वावरील नियुक्तीचा दुरूपयोग केला जाणार नाही. यासंदर्भात नियुक्ती प्राधिकाऱ्याने कुटुंबातील व्यक्तींची संख्या, त्यांची मालमत्ता/दायित्व, गंभीर आजारामुळे अथवा अपघातामुळे मृत झाला असल्यास त्यासाठी करण्यात आलेला वैद्यकीय खर्च/कुटुंबातील मिळवत्या व्यक्ती इ. बाबी विचारात घेणे अपेक्षित आहे.

**(६) लहान कुटुंबाचे प्रमाणपत्र:-** दि.३१.१२.२००१ नंतर तिसरे अपत्य झालेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियास अनुकंपा तत्त्वावर नियुक्तीसाठी पात्र समजले जाणार नाही.

**(७) योजनेची माहिती देण्याची जबाबदारी:-**

(अ) आस्थापना अधिकाऱ्याने अनुकंपा तत्त्वावर नियुक्तीच्या योजनेची माहिती (योजनेचा उद्देश, पात्र नातेवाईक, अर्ज करण्याची मुदत, शैक्षणिक अर्हता, टंकलेखन प्रमाणपत्र सादर करण्यास मुदत, अर्ज विहित नमुन्यात भरणे इ.माहिती ) संस्थान कर्मचाऱ्याच्या कुटुंबियांना एक महिन्याच्या आत उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. तसेच सदर माहिती मिळाल्याबद्दल कुटुंबाकडून पोच घेणे आवश्यक आहे.

(आ) दिवंगत संस्थान कर्मचाऱ्याचा पात्र वारसदार सज्ञान नसेल तर तो सज्ञान झाल्यानंतर एक वर्षाच्या आत अनुकंपा तत्त्वावर नियुक्तीसाठी अर्ज करु शकेल मात्र तो सज्ञान झाल्यावर त्याने असा अर्ज करणे अपेक्षित आहे, हे देखील मयत कर्मचाऱ्याच्या कुटुंबियांना एका महिन्याच्या आत कळविणे संबंधित आस्थापना अधिकाऱ्यावर बंधनकारक राहिल.

**(८) कुटुंबातील अन्य सदस्यांचा सांभाळ करण्याबाबतचे प्रमाणपत्र:-**

(अ) अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती देण्यापूर्वी संबंधितांकडून कुटुंबातील अन्य व्यक्तींचा सांभाळ करण्याबाबत प्रतिज्ञापत्र घेण्यात यावे.

(आ) अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती देण्यापूर्वी संबंधितांकडून दिवंगत कर्मचाऱ्यावर अवलंबून असलेल्या कुटुंबातील अन्य व्यक्तींचा सांभाळ करण्याबाबत प्रतिज्ञापत्र घेण्यात यावे. भविष्यामध्ये सदर प्रतिज्ञापत्राचे उल्लंघन झाल्याबाबतची तक्रार संबंधित कुटुंबातील सदस्यांनी केल्यास सदर तक्रारीची चौकशी संबंधित नियुक्ती प्राधिकारी / शिस्तभंगविषयक प्राधिकाऱ्याने करावी. चौकशीअंती अनुकंपा नियुक्तीधारकाने प्रतिज्ञापत्राचे उल्लंघन केल्याचे निष्पन्न झाल्यास त्याला सेवेतून काढून टाकण्याची देखील शिक्षा देता येईल.

**(९) कुटुंबातील इतर सदस्यांची संमतीपत्रे :-**

(अ) अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती ही कुटुंबातील एकाच पात्र नातेवाईकास अनुज्ञेय असल्याने कुटुंबातील इतर सदस्यांचे ना-हरकत प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक आहे.

(आ) ज्या संस्थान कर्मचाऱ्यांना वैयक्तिक कायद्यानुसार एकापेक्षा जास्त लग्न करण्यास प्रतिबंध नसेल अशा कर्मचाऱ्याच्या एकापेक्षा जास्त पत्नी हयात असल्यास, ज्या पत्नीला किंवा तिच्या मुलाला/ मुलीला अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती द्यायची आहे त्या व्यतिरिक्त अन्य पत्नीचे देखील ना-हरकत प्रमाणपत्र घेणे आवश्यक आहे.

**(१०) अर्ज करण्यासाठी मुदत:-**

(अ) अनुकंपा नियुक्तीसाठी दिवंगत संस्थान अधिका-यांच्या / कर्मचाऱ्यांच्या कुटुंबातील पात्र नातेवाईकाने संस्थान अधिकारी /कर्मचारी दिवंगत झाल्याच्या दिनांकापासून १ वर्षाच्या मुदतीत संस्थानचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्याकडे विहित नमुन्यात परिपूर्ण अर्ज सादर करणे आवश्यक आहे.

(आ) सेवेत असताना दिवंगत संस्थान अधिका-यांच्या /कर्मचाऱ्यांच्या कुटुंबातील अज्ञान वारसदारांपैकी कोणत्याही एकाने सज्ञान म्हणजे १८ वर्षाचा झाल्यावर एक वर्षाच्या आत अनुकंपा नियुक्तीसाठी परिपूर्ण अर्ज सादर करणे आवश्यक आहे.

(इ) पात्र वारसदारास विहित १ वर्षाच्या मुदतीनंतर २ वर्षे इतक्या कालावधीपर्यंत (मृत्यूच्या दिनांकापासून ३ वर्षांपर्यंत )तसेच दिवंगत संस्थान अधिका-याच्या /कर्मचाऱ्याच्या अज्ञान वारसदाराच्या बाबतीत तो उमेदवार सज्ञान झाल्यानंतर विहित १ वर्षाच्या मुदतीनंतर २ वर्षांपर्यंत (सज्ञान झाल्यानंतर ३ वर्षांपर्यंत ) अर्ज सादर करण्यास विलंब झाल्यास असा विलंब क्षमापित करण्याचे अधिकार संस्थानचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांना देण्यात येत आहेत.

अनुकंपा नियुक्ती धोरणातील १० (इ) या अटीशिवाय अन्य कोणत्याही अटी व शर्ती शिथिल करण्याचे अधिकार संस्थानाला राहणार नाहीत.

(ई) जोपर्यंत अनुकंपा नियुक्तीकरिता आवश्यक असलेली सर्व कागदपत्रे उमेदवाराकडून प्राप्त होत नाहीत तोपर्यंत त्याचे नाव प्रतिक्षासूचीमध्ये समाविष्ट करता येणार नाही. ज्या दिवशी संपूर्ण कागदपत्र प्राप्त होतील त्यादिवशीच त्याचे नाव प्रतिक्षासूचीमध्ये समाविष्ट करावे.

**(११) अनुकंपा नियुक्तीसाठी वयोमर्यादा:-**

(अ) किमान वयोमर्यादा-१८ वर्ष

(आ) कमाल वयोमर्यादा- वयाच्या ४५ वर्षापर्यंतच्याच उमेदवारांना अनुकंपा नियुक्ती अनुज्ञेय असेल. त्यामुळे प्रतिक्षासूचीतील उमेदवारांना वयाच्या ४५ वर्षापर्यंत नियुक्ती न मिळाल्यास त्यांची नावे वयाची ४५ वर्ष पूर्ण होताच आवश्यक ती नोंद घेऊन प्रतिक्षासूचीतून काढून टाकण्यात यावीत.

**(१२) अनुकंपा नियुक्तीसाठी शैक्षणिक अर्हता:-**

(अ) पात्र नातेवाईकाची शैक्षणिक अर्हता व निम्न वयोमर्यादेनुसार त्याला गट "क" किंवा गट "ड" मधील पदावर अनुकंपा नियुक्ती अनुज्ञेय राहिल.

(आ) संबंधित पदांसाठी विहित शैक्षणिक पात्रता आणि निम्न वयोमर्यादा याबाबतच्या अटी या नेमणूकीसाठी कटाक्षाने पाळण्यात येतील.

(इ) तथापि दिवंगत संस्थान कर्मचाऱ्याची पत्नी शैक्षणिक पात्रतेव्यतिरिक्त इतर अटी पूर्ण करीत असल्यास तिच्या बाबतीत गट-ड मध्ये नेमणूकीसाठी शैक्षणिक अर्हतेची अट शिथील करण्याचे अधिकार संबंधित नियुक्ती प्राधिकाऱ्याला असतील.

**(१३) गट "क" मधील लिपिक-टंकलेखक पदावर अनुकंपा नियुक्तीसाठी टंकलेखन प्रमाणपत्र सादर करण्यास मुदत:-**

(अ) अनुकंपा तत्त्वावर लिपिक-टंकलेखक पदावर नियुक्त झालेल्या उमेदवारांना विहित वेगमर्यादेचे टंकलेखन अर्हता प्रमाणपत्र सादर करण्यासाठी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दि.०६.१२.२०१० अन्वये ०६ महिने असलेली मुदत वाढवून ती २ वर्ष इतकी करण्यात येत आहे.

(आ) कोणत्याही कारणास्तव २ वर्षापेक्षा अधिक मुदतवाढ अनुज्ञेय असणार नाही. हा कालावधी संपताच नियुक्ती संपुष्टात आणावी.

**(१४) अनुकंपा तत्त्वावर गट"क" मधील लिपिक-टंकलेखक पदावर नियुक्ती मिळाल्यानंतर विहित मुदतीत टंकलेखक प्रमाणपत्र सादर न केल्यास अनुसरावयाची कार्यपध्दती:-**

अनुकंपा तत्त्वावर गट"क" मधील लिपिक-टंकलेखक पदावर नियुक्ती मिळाल्यानंतर टंकलेखनाची विहित वेग मर्यादेची परिक्षा पास होऊ शकले नाहीत म्हणून त्यांच्या सेवा संपुष्टात आणल्या आहेत, अशा उमेदवारांचा गट"ड" मधील नियुक्तीसाठी पदांची उपलब्धता विचारात घेऊन नव्याने नियुक्ती देण्याबाबत विचार करण्यात यावा. मात्र अशारितीने गट"ड" मधील पदावर नियुक्ती स्विकारल्यानंतर कुठल्याही परिस्थितीत गट"क" मधील पदासाठी त्याचा विचार करता येणार नाही, ही बाब त्यांना नियुक्तीपूर्वी स्पष्ट करावी.

**(१५) गट "क" मधील लिपिक-टंकलेखक पदावर अनुकंपा नियुक्तीसाठी संगणक अर्हता प्रमाणपत्र सादर करणे:-**

अ) D.O.E.A.C.C सोसायटीच्या अधिकृत "C.C.C." किंवा "O" स्तर किंवा "A" किंवा "B" किंवा "C" स्तरापैकी कोणतीही एक परिक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र किंवा,

ब) परिक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र किंवा महाराष्ट्र राज्य, उच्च व तंत्र शिक्षण मंडळ, मुंबई यांच्याकडील अधिकृत MS-CIT परिक्षा उत्तीर्ण झाल्याचे प्रमाणपत्र

संगणक ज्ञानाची वरील किमान अर्हता अनुकंपा तत्त्वावरील नियुक्तीच्या वेळी धारण करीत नसलेल्या उमेदवारांना सदर अर्हता गट "क" मधील पदावर (वाहन चालक वगळून) अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती झाल्याच्या दिनांकापासून २ वर्षांच्या आत प्राप्त करणे आवश्यक राहिल. या २ वर्षांच्या कालावधीत संबंधितांनी विहित संगणक अर्हता प्राप्त केल्याचे प्रमाणपत्र नियुक्ती अधिकाऱ्यांना सादर करावे, अन्यथा हा कालावधी संपताच उमेदवारांची अनुकंपा तत्त्वावरील नियुक्ती आपोआप संपुष्टात येईल, अशी स्पष्ट तरतूद उमेदवारांच्या नियुक्तीच्या आदेशात नियुक्ती प्राधिकाऱ्यांनी नमूद करावी.

**(१६) पद उपलब्धतेअभावी गट "क" मधील पदाऐवजी गट"ड" मधील पदावर नियुक्ती देताना अनुसरावयाची कार्यपध्दती:-**

गट "क" मधील पदांवर अनुकंपा तत्त्वावर नियुक्तीसाठी पात्र असणाऱ्या कर्मचाऱ्याला पदाच्या उपलब्धतेच्या अभावी गट"ड" मधील पदावर नियुक्ती दिल्यास पद उपलब्ध होताच गट"क" मधील पदावर त्याला प्राधान्याने नियुक्ती देण्यात यावी. अशी नियुक्ती सरळसेवा नियुक्तीने भरण्यात येणाऱ्या पदांवरील समजण्यात यावी. मात्र गट"ड" मधील पदावर अनुकंपा योजनेन्वये नियुक्ती देण्याच्या आदेशात तसा स्पष्ट उल्लेख करण्यात यावा, तसे करण्यात आले तरच गट"क" मधील पदावर नियुक्ती देता येईल.

**(१७) अनुकंपा नियुक्तीकरिता ठेवण्यात येणारी प्रतिक्षासूची वेबसाईटवर प्रसिध्द करण्याबाबत:-**

अनुकंपा नियुक्तीकरिता प्रतिक्षासूची असलेल्या उमेदवारांची नावे व इतर माहिती श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांच्या वेबसाईटवर प्रसिध्द करावी.

**(१८) अनुकंपा नियुक्तीसाठी विहित पदांची मर्यादा:-**

अनुकंपा नियुक्तीसाठी गट"क" व गट"ड" मध्ये प्रती वर्षी रिक्त होणाऱ्या पदांच्या १० टक्के पदे ही अनुकंपा नियुक्तीने भरण्यात यावी.

**(१९) मागासवर्गीयांसाठी आरक्षित ठेवलेल्या पदांवर अनुकंपा तत्त्वावर नियुक्ती देताना करावयाच्या कार्यवाहीबाबत:-** सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.अकंपा १२१७/प्र.क्र.१०२/आठ, दि.२१ सप्टेंबर, २०१७ व त्यानंतर यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित करण्यात येणाऱ्या शासन निर्णयातील तरतुदीप्रमाणे संस्थानाने कार्यवाही करावी.

**(२०) अनुकंपा तत्त्वावरील प्रतिक्षासूचीवरील उमेदवाराचे निधन झाल्यास त्याऐवजी कुटुंबातील अन्य पात्र वारसदाराचा समावेश अनुकंपा नियुक्तीच्या प्रतिक्षासूचीत करणे:-**

अधिका-याच्या /कर्मचाऱ्याच्या मृत्यूनंतर त्याच्या पात्र कुटुंबियाचे नाव अनुकंपाधारकांच्या प्रतिक्षासूचीमध्ये समाविष्ट केल्यानंतर त्याचे निधन झाल्यास प्रतिक्षासूचीवरील उमेदवाराऐवजी त्याच्या कुटुंबातील अन्य पात्र वारसदाराची नावे अनुकंपाधारकांच्या प्रतिक्षासूचीमध्ये मूळ उमेदवाराच्या प्रतिक्षासूचीतील दिनांकास घेतले जाईल. मात्र नव्या उमेदवाराचे वय सदर दिनांकाला १८ वर्षापेक्षा जास्त असावे. जर नव्या उमेदवाराचे वय मूळ उमेदवाराच्या प्रतिक्षासूचीतील दिनांकास १८ वर्षापेक्षा कमी असेल, नव्या उमेदवाराचे नाव त्याला ज्या दिवशी १८ वर्षे पूर्ण होतील त्या दिनांकास घेण्यात यावे.

**(२१) अनुकंपा नियुक्ती हा कर्मचाऱ्यांच्या कुटुंबाचा "वारसा हक्क" नाही:-**

मा. सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या विविध निर्णयानुसार अनुकंपा तत्वावरील नियुक्ती हा कर्मचाऱ्यांच्या कुटुंबाचा "वारसा हक्क" होत नाही. तसेच विशिष्ट कालावधी उलटून गेल्यावर अनुकंपा नियुक्ती अनुज्ञेय होत नाही.

**(२२) अनुकंपा नियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती शिथिल करण्याबाबत:-**

अनुकंपा नियुक्तीसाठी संस्थान कर्मचाऱ्यांच्या विधवांना केवळ गट"ड" मधील पदावर नियुक्ती करावयाची असल्यास शैक्षणिक अर्हता शिथिल करण्याबाबत तरतूद राहील.

अनुकंपा नियुक्तीबाबतचे प्रस्ताव कार्यालयास प्राप्त झाल्यानंतर त्यांची संपूर्ण शहानिशा संबंधित कार्यालयाने करुन जर अटी व शर्तीची पूर्तता होत असेल तरच तो प्रस्ताव विचारात घ्यावा अन्यथा ते प्रस्ताव कार्यालयाने त्यांचे स्तरावर उचित उत्तर देऊन निकालात काढावेत. त्याकरिता प्रस्ताव व्यवस्थापन समितीच्या सभेपुढे सादर करण्याची आवश्यकता नाही.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०२००९२५१३२८०६९६१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SUNITA PARAG SALUNKE

Digitally signed by SUNITA PARAG SALUNKE
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=a9ee0eef2d14d407f36dd3610d7d17b19cc85c5da3c6493dd1b6379b15e3372e, serialNumber=8f3e3dd76ae275cc1afa0c0be4edf609c0420709b30d7478f9b8cff1b4acde7d, cn=SUNITA PARAG SALUNKE
Date: 2020.09.25 13:28:33 +05'30'

**( सु. प. साळुंके )**
कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभाग.

**प्रति:-** १) मा अध्यक्ष, श्रीसाईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी.
२) मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, श्रीसाईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी.
४) निवड नस्ती/का.१६.